**आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२२-२३ करीता संजय गांधी निराधार अनुदान योजना व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजनेसाठी निधी वितरीत करणेबाबत. (लेखाशिर्ष २२३५ सी १६१, २२३५ सी १७२)**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२२ / प्र.क्र.६ / कार्यासन-६**
मंत्रालय, विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- १९ मे, २०२२.

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२२२/ प्र.क्र.४३ / अर्थ-३, दि.४.०४.२०२२.
२) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाची नस्ती क्र. विसयो-२०२१/प्र.क्र.५१/विसयो.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या संजय गांधी निराधार अनुदान योजना व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजना या योजनेंतर्गत अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना विशेष सहाय्य देण्यात येते. या लाभार्थ्यांना सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात अर्थसहाय्य देण्याच्या अनुषंगाने निधी वितरीत करण्याबाबत सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या संदर्भाधीन क्र.२ अन्वये प्रस्ताव या विभागास प्राप्त झाला आहे.

सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन परिपत्रकास अनुसरून वित्त विभागामार्फत अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण (BEAMS) वितरण प्रणालीवर ०१-वेतन, ३६- सहायक अनुदाने (वेतन) ही उद्दीष्टे वगळता इतर सर्व उद्दीष्टांसाठी अर्थसंकल्पित तरतूदीच्या ७ टक्के मर्यादेतील तरतूदी दरमहा वितरणासाठी उपलब्ध करून देण्यात येत आहेत. यास अनुसरून वितरणासाठी उपलब्ध निधी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागास वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमाती घटकासाठी मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण मधील संजय गांधी निराधार अनुदान योजना व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजना या योजनांकरीता सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतूदीपैकी १४ टक्के मर्यादेतील वितरणासाठी उपलब्ध निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

(रू.लाखात)

| अ. क्र. | योजनेचे नाव | बाब/ उद्दिष्ट | सन २०२२-२३ साठीची अर्थसंकल्पीय तरतूद | सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|
| १ | (०२)(०३) संजय गांधी निराधार अनुदान योजना, लेखाशिर्ष (२२३५ सी१६१) | ५०- इतर खर्च | १२०००.०० | १६८०.०० |
| २ | (०२)(०४) श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजना, लेखाशिर्ष (२२३५ सी१७२) | | २५०००.०० | ३५००.०० |
| | **एकूण** | | **३७०००.००** | **५१८०.००** |

२. उपरोक्त प्रमाणे **रु.५१८०.०० लाख (अक्षरी रुपये एक्कावन्न कोटी ऐंशी लाख फक्त)** इतका निधी प्रशासकीय विभागप्रमुख म्हणून प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरीत करण्यास मंजुरी प्रदान करण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.४.०४.२०२२ च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील. नियंत्रक अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. त्या अनुषंगाने झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

४. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना लाभ मिळेल याची दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित विभागाची राहील.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या वाचा क्र.१ येथील शासन परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०५०६१६५२३९३२२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAVINDRA D AUTE

Digitally signed by RAVINDRA D AUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, pseudonym=C4ECFFC229308BD3BD1E334FAC78848FBF7F7613, serialNumber=CA98EFAC317508AB9B5820B47955BC1BABB173F20D25ABD816ED91A9B6B0F16C, cn=RAVINDRA D AUTE
Date: 2022.05.19 15:05:54 +05'30'

**( रविंद्र दि.औटे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव.
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव.
३. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे
५. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
७. जिल्हाधिकारी, सर्व जिल्हे.
८. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प (सर्व)

९. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९ ), मंत्रालय, मुंबई.
१०. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
११. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१२. कार्यासन क्र.१२, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.